महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वेतनेत्तर बाबीकरीता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ -२०२३/प्र.क्र. ५८/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :- ३० मार्च, २०२४.

**वाचा:-**

(१) शासन परिपत्रक, वित्त् विभाग क्र. अर्थसं- २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल.२०२३.
(२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. राअआ/२०२३/प्र.क्र.५८/ का-९, दि.२ मे, २०२३.
(३) शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ-२०२३/ प्र.क्र.५८/का ९, दि.४ ऑगस्ट, २०२३.
(४) शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ-२०२३/ प्र.क्र.५८/का ९, दि.५ जानेवारी, २०२४.
(५) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/संकिर्ण/ प्र.क्र.५४/२०२४ का-३/दि.१२.३.२०२४ चे पत्र व सहपत्रे.

**प्रस्तावना –**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१)(१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत एकुण रु.४१,७५,०००/- (अक्षरी रुपये एकेचाळीस लाख पंच्याहत्त्र हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर तरतूदीपैकी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास संदर्भ क्र.२,३ व ४ च्या शासन निर्णयान्वये एकूण रु.१९,०१,८४४/- एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये अल्पसंख्याक आयोगाने मागणी केल्यानुसार उपलब्ध निधीच्या मर्यादेत अल्पसंख्याक आयोगाच्या कार्यालयीन खर्चासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय –

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१)(१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत एकुण रु.४१,७५,०००/- (अक्षरी रुपये एकेचाळीस लाख पंच्याहत्त्र हजार फक्त्) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार अर्थसंकल्पित निधीपैकी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या मर्यादेत रु.४.८० लक्ष (अक्षरी रुपये चार लक्ष ऐशी हजार फक्त) एवढे वेतनेत्तर अनुदान खालील तक्त्यात देर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिलवार लेखाशिर्ष | सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पिय अनुदान (रु.) | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वितरीत वेतनेत्तर अनुदान | सन २०२३-२४ मधील मंजूर अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४१,७५,०००/- | १९,०१,८४४/- | ४,८०,०००/- |
| | **एकुण** | **४१,७५,०००/-** | **१९,०१,८४४/-** | **४,८०,०००/-** |
| | | | | **(अक्षरी एकुण रुपये चार लाख ऐंशी हजार फक्त)** |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२३-२४ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहिल याची दक्षता घेण्यात यावी. कोणत्याही प्रकारची खरेदी व दुरुस्ती करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाचे तंतोतंत पालन करावे. तसचे ज्या उद्दीष्टांकरीता निधी वितरीत करण्यात आले आहे, केवळ त्याकरिताच खर्च करण्यात यावे. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशिल, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate शासनास वेळोवेळी सादर करणे बंधनकारक आहे. संदर्भ क्र. (२) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी “मागणी क्र.झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग

- २ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२२ मधील अटी शर्तीची पुर्तता होत असुन, त्यास अनुसरुन शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३०१८०५५००५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT
DADASAHEB
ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2024.03.30 18:16:01 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
६. कक्ष अधिकारी, का-७ , अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. निवडनस्ती का-९.